गत अध्यायात श्रीगुरु जालिंदरनाथांच्या शोधासाठी कानिफनाथ आपल्या शिष्यवृंदासह हेलापट्टण नगरीस आले. त्यांची कीर्ती ऐकून असलेला राजा गोपीचंद सदिच्छाभेटीस्तव अरण्यामाधल्या त्यांच्या शिबिरात पोहोचला. श्रीगुरूंना ज्याने भूमीच्या गर्तेत गाडले तो साक्षात समोर आलेला पाहून कानिफनाथ अतिशय क्रोधीत झाले पण या क्षणी आपण ह्याला शाप देऊन भस्म केले तर श्रीगुरूंचे निश्चित स्थान कळणार नाही. या आशंकेने त्यांनी विवेकाने राजाचा सत्कार स्वीकारला. शांत चित्ताने संधी मिळताच त्याची कानउघडणी करून निर्भत्सना केली. त्यानंतर रजा गोपीचंद सह नगरीत प्रवेश करून राजमहालात कानिफनाथांनी राजाला त्याचे कृष्णकृत्य ऐकविले. गोपीचंद तर भेदरूनच गेला. त्याच्या मातेने, राणी मैनावतीने आपल्या मुलाच्या प्रमादाबद्दल रदबदली करून अभय मिळविले. कानिफनाथांचा क्रोध शांत झाला पण श्रीगुरूंच्या हातून याला कसे वाचवावे याबद्दलची कार्यवाही मोठ्या हिकमतीने आचरून श्रीगुरूंना दृश्यमान केलेच पण राजा गोपीचंदचेही प्राण वाचविले. पश्चातापदग्ध झालेल्या गोपीचंदाने लौकीकार्थाचे राजवैभव त्यागून नाथपंथाची दीक्षा घेतली आणि हिमालयात बारा वर्षे कालावधीचे उग्र तप करण्यासाठी श्रीगुरूद्वय जालिंदर आणि कानिफनाथांचे आशीर्वाद घेऊन रवाना झाला. आता पुढे...

राजवैभवाच्या अशाश्वत जगताकडे निघालेला विरक्त गोपीचंद ईश्वर चिंतन करीत मार्गक्रमण करीत आहे. वाटेत लागलेल्या गावात क्षुधाशमनापुरती भिक्षा मागावी आणि पुढचा मार्ग धरावा. हा त्याचा नित्यक्रम सुरु आहे. श्रीगुरूद्वय जालिंदरनाथ आणि कानिफनाथ यांच्या आदेशान्वये हिमालयात बद्रिकेदारेश्वराचे आशीर्वाद घेऊन बारा वर्षे उग्र तपाचरण करण्यासाठी गोपीचंद निघाला आहे.

महाराज गोपीचंदाने संन्यास घेतल्याचे वृत्त गौड बंगाल आणि शेजारी राज्यातही वणव्यासारखे पसरले होते. त्यामुळे गावोगावची रयत हळहळत होती. “असा प्रेमळ प्रजापालक राजा पुन्हा होणार नाही. आईच्या ममतेने प्रजेवर माया करीत होता. सच्चा लोकहितकारी, कर्तव्यदक्ष आणि पराक्रमी राजा होता.” असे म्हणत अश्रू ढाळत. ज्या गावात राजा जाईल, तेथील प्रजाजन राजाला राहण्याचा आग्रह करीत येथेच राहून योग आचरावा म्हणून गळ घालत परंतु वैराग्य आलेला राजा नम्रतेने नकार देत असे. बडे व्यापारी, सावकार, सरदार अडवे येऊन म्हणत; “महाराज! प्रजेचा प्राणप्रिय राजा निघून चालल्यामुळे जनता प्राणहीन झाली आहे. आपण ईश्वरप्राप्तीसाठी तपाला जात आहात परंतु तप पूर्ण झाल्यावर परतून यावे.”

“अवश्य!” म्हणून गोपीचंद वेळ मारून नेत असे. अशा प्रकारे त्याच्या मार्गक्रमणेत व्यत्यय येत असे. गोपिचंद राजाने कौलबंगाल या शेजारी राज्याच्या हद्दीत प्रवेश केला. तिकडेही हे वृत्त सर्वश्रुत झाले होते. गोसावी झालेला राजा पाहून लोक दुःखीकष्टी होती. पौलपट्टण ही त्या देशाची राजधानी तिलकचंद राजा तेथे राज्य करीत आहे. गोपीचंदाची बहिण चंपावती ही राजा तिलकचंदाची सून. महराजा तिलकचंद हा सुद्धा मोठा वैभवशाली आणि पराक्रमी राजा आहे. हत्ती, घोडे, सैन्यदल, रथ, धन भांडार, किल्ले, कोट, दुर्ग यांची सुबत्ता असलेला तिलकचंद शत्रूंचा कर्दनकाळ समजला जात असे. त्याची सून चंपावती तिच्या दीर, नणंदा, जावा, सासू, सासरे, पती, यांना देवासमान मानत सासरी त्यांची सेवा करीत आहे. तिचा बंधू गोपीचंद गोसावी झाल्यामुळे सर्व नातेवाईक टवाळी करीत आहेत, “अरेरे! नपुंसक गोपीचंद, काय थेर चालविले आहेत? राजपद सोडून भीक मागत फिरत आहे. मृत्युपुढे सुद्धा याचना न करणाऱ्याला क्षत्रिय म्हणतात.

याने तर क्षात्रकुळाला काळिमा फासला. आमचेही तोंड केले. तुमचा सोयरा असा वेडपिसा होऊन घरोघरी भीक मागत का फिरत आहे. अशी आमच्याकडे कुणी चौकशी केली तर आम्ही काय उत्तर द्यावे? आम्हाला बाहेर तोंड दाखवायलाही लाज वाटते. लोक आमची निंदा करीत आहेत. त्या मैनावतीस याचे काहीच वाटत नाही. मुलाला देशोधडीला लावून जालिंदरला घेरून बसली आहे. विक्षिप्त स्त्री! रत्नाची वाटी टाकून हातात नरोटी घेण्याचा प्रकार केला आहे. सोन्याऐवजी चिंधी कपाळावर बांधली आहे. कोण भिकार, भणंग श्रीगुरु जालिंदराच्या नादाला लागून तोंड काळे केले आहे. स्वतःच्या घराला आग लावणारी ती लावंसट आहे. माता नक्कीच नाही. स्वपुत्राला गोसावी केले आणि गोसावी घेऊन बसली आहे. आता जर कुणा शत्रूने आक्रमण केले तर ती काय प्रतिकार करणार?

अनेकांची अनेक मुखांनी दुषणे; कुणाचे मुख बंद करणार? एक एक वाक् ताडन चंपावतीचे काळीज विदिर्ग करीत असे. हृदय घायाळ करीत असे. अश्रु ढाळत बंधुरायाच्या आणि मातेच्या आठवणीने उर भरून आला. पुन्हा आपल्या दुःखाचे प्रदर्शन करावयाचे नाही. आवाज न करता मूक रुदन! तोंड दाबून बुक्क्याचा मार सहन करावयाचा हे एक दिव्यच. बाहेर पडणारा हुंदका महाप्रयासाने थोपवून धरला आहे. ते पाहून नणंदा, जावा चेष्टा करीत आहेत. “अहाहा! काय पण आईचा आणि भावाचा पुळका आला आहे. मोठा उजेडच पाडला ना त्यांनी? तिन्ही लोकांत दिवाच लावला. भाऊ दारोदार भिक मागत आहे. आता ही सुद्धा तेच करणार! ती मैनावती, काळे तोंड करून बसली आहे आणि ही इथे रडवे तोंड करून बसलीय! अशा प्रकारच्या दाहक आणि बोचऱ्या वाग्बाणांनी चंपावती घायाळ झाली. शस्त्रांपेक्षा शब्दांना जीव जास्त घायाळ होता. शब्दांचे विषारी फटकारे जीवघेणे असतात.

गोपीचंद राजनगरीच्या पाणवठ्यावर येऊन बसला आहे. शिंगीच्या नादलहरीत हरीभजनात तल्लीन झाला आहे. सूर्यनारायण ढगांमुळे प्रकशहीन होत नाही, किंवा कस्तुरी कितीही लपविण्याचा प्रयत्न केला तरी तिचा सुगंध लपला जात नाही; तद्वत बैरागी वेष धारण केल्यामुळे गोपीचंद राजाचे राजबिंडे रूपही काही लपत नव्हते. पाणवठ्यावरील स्त्रियांना आणि दासींनी राजा गोपीचंदास ओळखले आणि ही गोष्ट महाराज तिलकचंदासह सर्वांच्या कानावर गेली. महाराज तिलकचंद फारच व्यथित होऊन म्हणाले, “काळे तोंड घेऊन आमच्या नगरीत आला, आता दारोदार भिक्षा मागून आमची अप्रतिष्ठा करणार! लोक म्हणतील महाराज तिलकचंदाच्या सुनेचा हा भाऊ! राजघराण्यातला आप्त पहा, भिक मागतो आहे. त्यामुळे आमची मान शरमेने झुकणार आहे. त्यापेक्षा त्याने स्वतःच्या नगरीतच भिक मागत फिरले असते तर चालले असते. आमची मानहानी करण्यासाठी कशाला आला इथे?

राजवाड्यातील सर्व लोक मात्र राजाला वेडाच समजत होते. महाराज तिलकचंदाने खासगीतील एका सेविकेस सांगितले, “लक्षपूर्वक ऐक! तो गोपीचंद येऊन पाणवठ्याजवळ बसला आहे. आता भूक लागली की दारोदार भिक मागत फिरेल. त्यामुळे आमची अपकीर्ती होणार. तेव्हा तू ताबडतोब जाऊन त्यांना घेऊन ये आणि अश्वशाळेत बसव. तेथेच त्याला खाणे पिणे दे आणि तेथूनच त्याची बोळवण कर. परंतु त्याला नगरीत भटकू देऊ नकोस. त्याचे थोबाड पाहण्याचीही आमची इच्छा नाही.

राजाज्ञेनुसार दासी गोपीचंडाकडे जाऊन म्हणाली, महाराज! आपणास राजाने, भगिनी चंपावतीच्या भेटीसाठी बोलाविले आहे.” गोपीचंद म्हणाला, “माई! आम्ही गोसावी. घरोघरी आमच्याच भगिनी नांदत आहेत. असो! चंपावतीने बोलाविले आहे, तर तिला भेटूनच पुढील मार्ग धरावा.” असे म्हणून तो दासीबरोबर निघाला. तिने मागील दाराने आणून त्याला

घोड्यांच्या पागेत बसविले बसविले, "आपण येथेच बसावे. चंपावती बाईसाहेब स्वतः येथे येऊन गुप्तपणे तुमची भेट घेतील. ही जागा मात्र तुम्ही सोडू नका." असे म्हणून तिने वाड्यात जाऊन सांगितले. महाराणीने त्वरेने जेवणाचे ताट भरून एका दासी बरोबर त्याच्याकडे पाठवून दिले. ताट पुढ्यात ठेऊन दासी म्हणाली, "महाराज! प्रथम जेवण करा, त्यानंतर बाईसाहेब तुमच्या भेटीसाठी येतील. जेवणाला सुरवात करा आणि पोटभर खा." गोपीचंद मनात विचार करू लागला, "हेव तर माझे सोयरे, असे का माझ्याशी वागतात? दासी करवी भोजन ताट! अश्वशाळेत मला बसविले असे आदर सत्कार होत आहे!! रीतीरिवाज विसरले की काय? असो! आपण संन्यासी आहोत, शत्रुमित्र, रागलोभ, सुखदुःख सर्व समान असावे आपल्यासाठी आपण माना अपमानाचाही त्याग केलाच आहे. समोर आलेले अन्न हे पूर्णब्रह्म आहे. त्याचा धिक्कार करून अवमान करणे बरे नाही. उदरभरण नोहे, जाणिजे यज्ञकर्म.." असा विचार करून राजाने अन्न ग्रहणांस सुरवात केली.

अंतःपुरातील स्त्रिया खिडकीतून, फटीतून, गावाक्षांमधून डोकावून बघत विडंबनात्मक दोषारोप करीत होत्या, "बाई गं! काय हा कोडगेपणा? सोयऱ्यांच्या घरी येऊन अश्वशाळेत बसून गिळत बसला आहे. लाजशरम कुठे ठेवली याने? जा!! चंपावतीलाही आणून दाखवा." एक नणंद पळत गेली आणि चंपावतीचा हात धरून ओढत आणली व म्हणाली, "तो बघ तुझा भाऊ किती अधोगती झाली त्याची. मानपान सोडून चोरसारखा अश्वशाळेत घोड्यांच्या पंक्तीला बसून तुकडे गिळतोय, एके काळचा राजा. वैभव सोडून भंणग भिकारी बनून दारोदार भटकतोय. चोरासारखाच दिसतोय! तिकडेच बोंबलत फिरायचे, सोयऱ्यांच्या दारात निर्लज्जासारखे कशाला यावे!" हे ऐकून चंपावती दुःखी झाली, शिवाय आपल्या भावाची अवस्था प्रत्यक्ष पाहिल्याने अतोनात कष्टी झाली. नणंदाच्या आणि जावांच्या उपहासात्मक बोलांनी जखमेवर मीठ चोळले गेले. दुःखाने आणि अपमानाने वेडीपिशी झालेली चंपावती देहभान हरपून धावत सुटली, आपल्या महालात गेली. संतापाच्या भरात तिने धारदार खंजीर उचलला आणि पोटात खुपसला. रक्ताची कारंजी उडाली, घाव वर्मी लागल्यामुळे पोट फाडून कोथळाच बाहेर आला, भावावरून हिणविल्याने अपमानित झालेल्या बहिणीने आत्मघात केला.

भोजन झाल्यावर गोपीचंद दासीला म्हणाला, "अहो माई! चंपावतीला लवकर बोलवा. मला निघावयाचे आहे. उशीर होत आहे." दासी उत्तरली, "अहो महाराज! आपणास समजत नाही काय? चंपावती सासुरवाशीण आहे. ती राजघराण्यातील लक्ष्मी असल्याने उघडपणे अश्वशाळेत कशी येईल? परंतु आम्ही युक्तीने तिला गुप्त वेषांत येथे घेऊन येणार आहोत. आपण आज येथेच मुक्काम करावा. रात्री तुम्हा बहिण भावांची भेट घडवून आणू."

"ठीक आहे. आजचा दिवस राहतो पण चंपावतीची आणि माझी भेट घडवा." "अवश्य!" असे म्हणून ती दासी चंपावतीच्या महालात गेली.

दासी महालात पाहते तर; रक्ताच्या थारोळ्यात चंपावती अचेतन होऊन पडली होती. दासीने किंकाळी ठोकली काय झाले ते पाहण्यासाठी सर्वजण धावले. समोरचे दृश्य पाहून सर्व चक्रावलेच. दुःखीकष्टी होऊन म्हणाले, "अरेरे! भावासाठी बापुडीने जीव दिला. हे अधम, अपशकुनी गोपीचंद काळाच्या रुपात आला. त्याच्या आगमनाने अशुभ घडत आहे. दुष्टाने स्वतःच्या घराला आग लावली आणि आता आमचेही घर पेटवून दिले. अशा पाप्याचे तोंडसुद्धा पाहू नये. हाकलून द्या त्याला." "त्याच्या आताताईमुळेच चंपावतीने आत्मघात केला. तयाकारणे या नराधामाचीही अशीच गत झाली पाहिजे. तिच्या सवे यालाही यमलोकी पाठवले पाहिजे." असे संतापयुक्त संवाद होत रडारड सुरु झाली. कुणी

हंबरडा फोडला. कुणी छाती पिटायला लागले. कुणी मस्तक जमिनीवर आपटू लागले. काही शोक अनावर होऊन मूर्च्छित पडले.

तिच्या आत्मघाताने दुःखी कष्टी झालेले आपल्या भावना व्यक्त करताना म्हणत होते. "फार सद्‌गुणी होती, तिच्या पतीचे दुर्दैव्य, चंपावती खानदानी अब्रूदार होती. भावाची वाताहात पाहून प्राणत्याग केला, काय तिचे गुण वर्णावे? देवगुणे होती. सर्वात गोमटी होती. सदा आनंदी, हसतमुख असायची. कोकिळेसारखी मधुर बोलायची, सासुरवास असून सुद्धा कधी उदास झाली नाही. पतीला परमेश्वर मानून सेवा करीत असायची. सासू सासऱ्यांना माता पिता मानून सेवा करायची. नुसता कोलाहल, रडारड आणि आक्रोश चालला आहे. अश्वशाळेपर्यंत अस्पष्टपणे गोंधळ ऐकू येत होता. गोपीचंदाने उत्सुकतेपोटी अश्वरक्षकाला विचारले, "काय हो! कसला कोलाहल उठला आहे? काय झाले?

"अहो! आपल्या भावासाठी राणीने प्राणत्याग केला. काय सांगावे मुनिवर!!" गोपीचंदाने पुन्हा प्रश्न केला. "कोण राणी? काय नाव त्या राणीचे?" "चंपावती राणी. तिचा भाऊ राजवैभव सोडून गोसावी झालाय. वेडापिसा होऊन भटकतोय म्हणून तिने आत्महत्या केली."

"चंपावती? तिच्या भावाचे नाव काय?

"राजा गोपीचंद." अश्वरक्षकाचे हे शब्द कानात शिरताच, देहवर वीज कोसळली आहे असे वाटले. लाडक्या बहिणीचे गुण आठवून हुंदके देऊ लागला. "माझ्या प्रिय भगिनी, हे काय केलेस? वेडा विचार करून माझ्यासाठी आपले प्राण ओवाळून टाकलेस? बहिणीच्या मृत्यूस कारणीभूत झाल्याचा डाग मला लागला. सोयऱ्यांनाही मी दुःखात लोटले. जगात माझी अपकीर्ती झाली. मी तिरस्कारणीय ठरलो" अशा विचारात गोपीचंद शोकाकुल होऊन बसला आहे.

चंपावतीच्या अंत्यसंस्काराची तयारी करून प्रेतयात्रा स्मशानाकडे निघाली. गोपीचंदही त्या अंत्ययात्रेत सामील झाला. नेत्रांतून अश्रुधारा वाहत आहेत. पुरुषांचा शोक संयमी असल्यामुळे आतल्या गलबलून आले. चालतांना गोपीचंदच्या मनात विचार आले. "माही सर्वत्र अपकीर्ती झाली. आता बहिणीस जिवंत करून कीर्ती मिळवावी. जगाला नाथपंथाचा प्रताप दाखवावा. गोसावी म्हणून दक्ष राजाने श्री शंकराची उपेक्षा केली असता शंकराने जसा स्वतःचा प्रताप दाखविला. बळीराजाने वामनाला क्षुल्लक मानल्याने वामनाने जसा पराक्रम केला. अगस्ती ऋर्षीनी जसा सागर प्राशन केला. मृदूमान्य राक्षसाला मारून एकादशीने जशी कीर्ती मिळवली. रावणाने मर्कट समजलेल्या पवनपुत्र मारुतीने लंकेचा काळ होऊन जो पराक्रम केला; तसा पराक्रम केला पाहिजे. गोसावी झालो म्हणून सर्वजण माझी अवहेलना करीत आहेत. पण हा केवळ माझा अपमान नसून नाथपंथाची हेटाळणी आहे. आता यांना पराक्रमी नाथपंथाचा चमत्कार दाखविला पाहिजे." विचारांच्या गर्तेत स्मशानात केव्हा येऊन पोहोचले ते कळले आही. चिता रचण्यात आली. चंपावतीचे निष्प्राण कलेवर जमिनीवर ठेवले आहे.

गोपीचंद प्रेताजवळ उभे राहून सर्वांना हात जोडून म्हणाला, "माझी एक विनंती ऐका सज्जनहो! या प्रेताचे दहन करू नका. मी माझे गुरु जालिंदरनाथ यांना येथे आणतो. ते चंपावतीला जीवंत करतील मी येथे स्वतः हजर असताना जर बहिणीला जीवंत करू शकत नसेन तर माझ्या नाथपंथी दीक्षेचे सार्थक काय? आस्तीकाने मातुलकुलाचे रक्षण केले. तसे मी चंपावतीचे रक्षण करीन. ऐरणीमध्ये हिरा रुतून बसला असता हिरकणीने काढावा, तसे मी चंपावतीस काळाच्या दाढेतून बाहेर काढीन. माझ्यावर विश्वास ठेवा. श्रीगुरु येईपर्यंत धीर धरा. चंपावती जीवंत होईल." गोपीचंदावर

प्रथमपासून रुष्ट असलेल्या उपस्थितांनी त्याच्या बोलण्यावर अविश्वास दाखवून म्हणाले, “बाबारे! कशासाठी आम्हास पिडतो आहेस? मृत देहाचे सुखाने भस्म तरी होऊ दे. मेलेला पुन्हा जीवंत झाल्याचे कधी ऐकले नाही. वठून मृत झालेल्या झाडाला पालवी फुटत नाही. हे तू नव्हे, तर तुझे धर्मवेड बोलत आहे. तू ठार वेडा झाला आहेस, हेच खरे.

“सज्जनहो! माझ्यावर विश्वास ठेवा. आपणास माझ्या गुरूदेवांचा प्रताप माहित नाही. त्यांच्या पराक्रमाचे वर्णन करण्यासाठी शारदेवी प्रतिभासुद्धा कमीच. त्यांनी कानिफनाथांना देवांचा आशीर्वाद प्राप्त करून देण्यासाठी सर्व देवांना धरणीवर उतरविले आणि आशीर्वाद देण्यास त्यांनी नकार देताच त्या सर्वांना झाडावर उलटे टांगले. गैरसमजुतीने मी स्वतः त्यांना जीवंत गाडले होते, तेव्हा तब्बल अकरा वर्षे भूगर्भात ध्यानावस्थेत राहिले. तुम्ही फक्त चार दिवस हे प्रेत सांभाळा. मी गुरुदेवांना घेऊन येतो.” पण असल्या भाकड कथांवर कुणी विश्वास ठेवायला तयार नाही. चिता रचून झाली, गोवऱ्या लावण्यात आल्या. चितेवर प्रेत ठेवून अग्नी देण्याची तयारी झाली. ते पाहून गोपीचंद संतप्त झाला, तो चितेवर चढून बसला आणि म्हणाला, “लावा अग्नी, पेटवा, चंपावतीबरोबर माझेही दहन करा मग माझे गुरु येतील आणि शाप देऊन तुम्हासर्वांना भस्म करतील.” एवढा वेळ संयम राखून गप्प राहिलेले महाराज तिलकचंद क्रोधाने म्हणाले, “अरे मुर्खा! उतर खाली. एवढी गुरूची महती सांगतोस, तर प्रेताचा डावा हात काढून देतो. तो नेऊन गुरूला दाखव आणि घेऊन ये त्याला पाहू दे तुझ्या गुरूचा चमत्कार. तो पर्यंत आहे त्या स्थितीत प्रेताचे रक्षण करू. चल निघ त्वरेने.” गोपीचंद पटकन उत्तरून म्हणाला, “फार बरे होईल महाराज, प्रेताला मात्र सांभाळा. तिचा हात द्या. तो दाखवून श्रीगुरूंना घेऊन येतो.

“ठीक आहे, ठीक आहे प्रेताचा डावा हात काढून द्या रे त्याला.” बहिणीच्या प्रेताचा डावा झोळीत घेऊन गोपीचंद श्रीगुरु जालिंदरनाथांना भेटण्यासाठी परत हेलापट्टण नगरीकडे निघाला.

गोपीचंद दूर गेलेला पाहताच राजाने आज्ञा केली; “प्रेताला अग्नी लावा. मृतदेहाची झाली एवढी विटंबना पुरे झाली.” अग्नी देताच चिता धडाडून पेटली चंपावतीचे शरीर कापरासारखे जाळून भस्म झाले.

इकडे गोपीचंद, बहिणीचा हात घेऊन पळत सुटलाय. हेलापट्टण नगरीत श्रीगुरूंनी योगचक्षुंनी हे धावाधाव जाणून घेतली. मनात म्हणाले, “गोपीचंद परत येतोय हे काही बरे नाही, लोकं नावे ठेवतील, निंदा करतील शिवाय येथील मायेचा गोतावळा पुन्हा त्याच्या मार्गात आडवा येईल.” असा विचार करून स्वतःच्या कपाळावर प्रयाण अस्त्र विभूती लावली. निषधराज पुत्राला आणि जालिंदराला प्रयाणअस्त्र अवगत होते. त्याच्या प्रभावाने निमिषार्धात, ते गोपीचंद समोर दत्त म्हणून प्रकटले. त्याला अडवून विचारले; “वत्सा, परत का फिरलास? मग गोपीचंदाने चरणस्पर्श करून चंपावतीचा झालेला वृतांत कथन केला. गुरुदेव म्हणाले, “चिंता करू नकोस. तुझे मनोरथ पूर्ण करीन मला तिथे घेऊन चल.”

गुरु आणि शिष्य पौलपट्टण नगरीत येऊन पाहतात तर चंपावतीस अग्नी देऊन आलेले आप्तजन गोळा होऊन बसले आहेत. एवढ्या अल्प काळात अकस्मात दोघा नाथांना समक्ष पाहून तिलकचंद थक्क झाला. गुरुदेवांची तेजस्वी चर्या पाहून घाबरला खर पण दिखाऊपणे चरणावर लोटांगण घातले. त्यांना सुवर्णासनावर बसवून हात जोडून समोर उभा राहिला पण त्याच्या देहबोलीतला कृत्रिमपण लपत नव्हता.

शेळीच्या गळयजवळचे स्तन, बहुरुप्याचा आवेश किंवा गणिकेचा साज शृंगार जसा बेगडी असतो, काट्यांनी भरलेल्या हिरव्या झाडाखालची सावली, वृंदावनच्या फळांचा कडवटपणा, केळीसारखी दिसणारी रुईच्या झाडांची फळे,

विश्वासघातकी दांभिकेने गळयात घातलेल्या माळा, हे जसे फसवे असते, तसेच राज्याच्या भक्तीभावाचा देखावा कृत्रिम होता. बगळ्याची समाधी आणि तास्कराचे मौनव्रत खरे नसते, गुराख्याने मारलेल्या तानेला सुरेल स्वर नसतो, किंवा समुद्राचे पाणी द्रोणांत घेऊन प्राशन केले तरी ते खारटच रहाते व पिण्याजोगे नसते, पिवळे भासणारे सोने असतेच असे समजू नये, ते पितळसुद्धा असू शकते. घरात घुसलेल्या स्त्रीचे सवाष्णपण, भोंदुची देवभक्ती, रेड्याला 'गणेश' म्हणून संबोधणे हे सर्व विसंगत व लबाडपण आहे.

तिलकचंदाचीही अशाच प्रकारची लबाडी श्रीदेवांनी जाणली, गुरूंनी विचारले, "चंपावती कुठे आहे? गृहीणीशिवाय घराला शोभा नाही. कितीही सजविले तरी सजणार नाही. गाढवाला चंदन लेप लावण्यासारखे वाटते, त्यात वावरणारा पुरुष म्हणजे सोन्याच्या पिंजऱ्यातील कावळा वाटतो. चंपावतीच्या नसण्याने ही कळा आली आहे. असो! गोपीचंदा तुझ्या झोळीतून हात काढून दे पाहू!" हात समोर ठेवण्यात आला. नाथांनी संजीवनी मंत्राचा जप करून भस्म सिद्ध केले आणि त्या हातावर फुंकले. म्हणाले, "चल ये बेटा, उठून बस!" हाकेसरशी चंपावती उठून बसली. प्रत्यक्षात अवतरलेल्या सजग सचेतन चंपावतीने श्रीगुरु जालिंदरनाथांचे दर्शन घेतले.

चंपावती जीवंत झाल्याचे पाहून उपस्थितांची वाचा बसली. थक्क होऊन पाहत राहिले. स्वप्न की सत्य हे पाहण्यासाठी देहाला चिमटा घेऊन खात्री करून घेतली आणि भक्तीभावाने नाथांचे दर्शन घेतले. उपस्थितांनाही साक्षात्कार झाला. "होय! गोपीचंद राजा सत्य सांगत होता. काय करावयाची धन दौलत आपणही सनातन योगाचा, नाथपंथाचा स्वीकार करावा" परंतु हे विचार क्षणिक होते. निर्मळ पाण्याने अंघोळ घातली तरी हत्ती पुन्हा घाण पाण्यात जाऊन डूबणारच. नर्क यातनेतून सुटण्याचा योग सगळयांच्याच भाग्यात नसतो.

जालिंदरनाथ परत निघाले. तेव्हा तिलकचंद राजा समोर येऊन हात जोडत म्हणाला, "महाराज! मी पापी आहे, वैभवाने उन्मत होऊन मी गोपीचंदाचा अपमान केला. क्षमा असावी. अपराध पोटात घाला, आज येथेच मुक्काम करावा." यावर नाथ म्हणाले, "बेटी चंपावतीच्या हस्ते पाकसिद्धी करून भोजन होणार असेल तर अवश्य राहीन." हर्षभरीत होऊन चंपावतीने सुग्रास भोजन बनविले. भोजनाच्या पंक्तीत श्री गुरूंनी चंपावतीला व तिच्या पतीला स्वतःबरोबर बसविले, भोजन सुरु करण्यापूर्वी चंपावतीस अनुग्रह दिला. सज्ञान करून नाथपंथात समाविष्ट केले. आपल्या मुखातील उष्टा अमृत घास संजीवनी प्रयोगाने भरवून अमर केले. भोजनोत्तर विडे घेऊन मंडळी समाधान पावली.

मुनिराज जालिंदरनाथ तिलकचंदास म्हणाले, "राजान, गोपीचंद नाथपंथी झाला असून त्याचा गादीवर त्याचा पुत्र मुक्तचंद विराजमान आहे. तथापि त्याचे वय लहान आहे. तू त्याच्या शेजारील राजा आहेस, तेव्हा मुक्तचंदाचे रक्षण कर. मी तेथे सहा महिने राहून तीर्थाटनासाठी निघून जाईन, तेव्हा त्याच्या संकटकाळी तू मदतीस धावून जावेस. तू मोठा पराक्रमी असून शत्रूंचा कर्दनकाळ असल्याने तुझ्यावर ही जबाबदारी सोपवत आहे.

"जशी आज्ञा गुरुदेव! आपण निश्चिंत राहावे." एक दिवस मुकामी राहून नाथ परत हेलापट्टणास गेले. गोपीचंदाने बद्रिकाश्रमात जाऊन घोर तपश्चर्या सुरु केली. हेलापट्टणातील वास्तव्य संपविताना मुक्तचंदाला अनेक उपदेश करून श्रीगुरु जालिंदरनाथ, कानिफनाथ आणि शिष्यपरिवार तीर्थयात्रेला निघून गेले. बारा वर्षे तीर्थे भ्रमण करीत बद्रिकाश्रमात येऊन पोहोचले. गोपीचंदाच्या तपाची सांगता केली. उद्‌यापनासाठी सर्व देवतांना निमंत्रित करून आशीर्वाद मिळवून दिला.

**धन्य ते गुरु जालिंदरनाथ आणि धन्य ती राजमाता मैनावती, जिने पुत्र गोपीचंद आणि कन्या चंपावती यांना अजरामर केले.**

**फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने ब्रह्महत्येचे पातक नष्ट होऊन पितरांचा उद्धार होईल.**